**आदिवासी विकास विभागांतर्गत कार्यरत शासकीय आश्रमशाळा व शासकीय वसतिगृहांच्या इमारत बांधकामांसाठी जमिनी खरेदी करण्याकरिता आयुक्त, अपर आयुक्त व प्रकल्प अधिकारी यांना अधिकार देण्याबाबत.**

महाराष्ट्र शासन
आदिवासी विकास विभाग,
शासन निर्णय क्र. जमिन-२००९/प्र.क्र.६५/का.१३
मंत्रालय विस्तार, मुंबई-३२.
दिनांक : ३१ ऑगस्ट, २००९.

वाचा :- शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र.भूवाये-२००३/प्र.क्र.१४२/का.९, **दिनांक २४ फेब्रुवारी, २००४ व शासन शुध्दीपत्र दिनांक २५ नोव्हेंबर, २००५.**

प्रस्तावना :- राज्यातील ५४९ शासकीय आश्रमशाळांपैकी १४० आश्रमशाळांच्या बांधकामासाठी जमिन उपलब्ध नाही. तसेच ४१६ शासकीय वसतिगृहांपैकी ३६१ इतक्या वसतिगृहांच्या बांधकामांसाठी अद्याप जमिन उपलब्ध झालेली नाही. त्यामुळे सर्व सोयींनी युक्त अशी शासकीय इमारत आश्रम शाळांसाठी व वसतिगृहांसाठी बांधणे शक्य होत नाही. परिणामी भाडयाच्या इमारतीत अथवा कमी जमिन असलेल्या ठिकाणी जुन्या शेडस् मध्ये आश्रमशाळा सुरु आहेत. तर भाडयाच्या इमारतीत वसतिगृहे सुरु आहेत.

२. दारिद्रय रेषेखालील भूमीहीन आदिवासींचे सबळीकरण व स्वाभिमान योजनेंतर्गत अनुसूचित जमातीच्या कुटुंबांना उत्पन्नाचे स्त्रोत उपलब्ध व्हावेत म्हणून जमिन उपलब्ध करुन देण्यात येते. सदर योजनेंतर्गत उपरोक्त दिनांक २४.२.२००४ व २५.११.२००५ च्या आदेशान्वये जिल्हाधिकारी यांचे अध्यक्षतेखाली समिती स्थापन करण्यात आली असून सदर समिती जमिनीचे दर निश्चित करते. सदर समितीने निश्चित केलेल्या दराने खाजगी जमिन मालक जमिन विकण्यास तयार नसतात. त्यामुळे आश्रमशाळांच्या/ वसतिगृहांच्या इमारत बांधकामांसाठी जमिनी उपलब्ध होत नाहीत. म्हणून शासकीय आश्रमशाळा व शासकीय वसतिगृहांसाठी जमिनी खरेदी करण्यासाठी निश्चित केलेल्या दरांपेक्षा जास्त दराने जमिनी विकत घेण्यासाठी क्षेत्रिय अधिकाऱ्यांना अधिकार देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. शासनाने आता याबाबत खालीलप्रमाणे निर्णय घेतलेला आहे :-

शासन निर्णय :- आदिवासी विकास विभागांतर्गत कार्यरत शासकीय आश्रमशाळा तसेच शासकीय वसतिगृहांच्या इमारतींच्या बांधकामांसाठी जमिनी खरेदी करण्याकरिता संबंधित जिल्हाधिकाऱ्यांनी निश्चित केलेल्या दरांपेक्षा जास्त दराने जमिन विकत घेण्यासाठी प्रकल्प

अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, अपर आयुक्त, आदिवासी विकास व आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांना याद्वारे खालीलप्रमाणे अधिकार प्रदान करण्यात येत आहेत :-

१) जिल्हाधिकाऱ्यांनी निश्चित केलेल्या खेडेगावांतील जमिनीच्या दरापेक्षा २०% जास्त दराने जमिन खरेदी करण्यास संबंधित प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प यांना अधिकार देण्यात येत आहेत.

२) जिल्हाधिकाऱ्यांनी निश्चित केलेल्या खेडेगावांतील जमिनीच्या दराच्या दुप्पट दरापर्यंत जमिनी खरेदी करण्याचे तसेच 'ब' व 'क' वर्ग नगरपरिषदांच्या भौगोलिक हद्दीमधील जमिनी शासकीय दराच्या दीडपट दराने खरेदी करण्याचे अधिकार संबंधित अपर आयुक्त, आदिवासी विकास यांना देण्यात येत आहेत.

३) जिल्हाधिकाऱ्यांनी निश्चित केलेल्या खेडेगांवातील जमिनीच्या दराच्या दुप्पटीपेक्षा जास्त दराने जमिनी खरेदी करण्याचे 'ब' व 'क' वर्ग नगरपरिषदांच्या भौगोलिक हद्दीतील जिल्हाधिकाऱ्यांनी निश्चित केलेल्या जमिनींच्या दराच्या दुप्पट दरापर्यंत जमिनी खरेदी करण्याचे अधिकार आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांना देण्यात येत आहे.

४) 'अ' वर्ग नगरपालिका व महानगरपालिकांच्या भौगोलिक हद्दीतील शासकीय आश्रमशाळा व शासकीय वसतिगृहांच्या इमारती बांधकामांसाठी शासनाने वरीलप्रमाणे निश्चित केलेल्या दरापेक्षा जास्त दराने जमिन खरेदीचे प्रस्ताव शासनाच्या मान्यतेसाठी सादर करण्यात यावेत.

२. यावरील खर्च, "मागणी क्र.टी-६, ४४२५, अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्ग यांच्या कल्याणावरील भांडवली खर्च-पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-०२, अनुसूचित जमातीचे कल्याण-७९६, जनजाती क्षेत्र उपयोजना- (०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना- (०१)(०४), भूमि संपादन- राज्य योजनांतर्गत योजना (४२२५ ०१३१)" या लेखाशिर्षाखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा व तो त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाचा वेबसाईटवर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक २००९०९०५१२३६१३००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( ग.गो.पंचभाई )
शासनाचे सह सचिव.

**प्रति,**

मा.मंत्री (आ.वि.) यांचे खाजगी सचिव.
मा.राज्यमंत्री (आ.वि.) यांचे खाजगी सचिव.

G:\MAHESHC.R.65
एच-१५९१ -१अ

आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक.
आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे.
अपर मुख्य सचिव (महसूल), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
सचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
सर्व विभागीय आयुक्त.
सर्व जिल्हाधिकारी.
अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे/नाशिक/नागपूर/अमरावती.
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषदा.
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
लेखा व कोषागारे संचालनालय, संगणक शाखा, नवीन प्रशासकीय भवन, मुंबई-३२.
सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.
सर्व कक्ष अधिकारी,अवर सचिव, उप सचिव व सह सचिव, आदिवासी विकास विभाग.
निवड नस्ती (का.१३).

-------